खरीप हंगाम सन २०१० साठी स्फुरदयुक्त / पालाशयुक्त व संयुक्त खताचा संरक्षित साठा (बफर्स स्टॉक ) करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र. राखते ३७०९/प्र.क्र.१९५/१७ अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२
दिनांक :२८ जानेवारी, २०१०

**प्रस्तावनाः**

खरीप हंगामात मे, जून व जुलै या कालावधीमध्ये खताची खरेदी व प्रत्यक्ष वापर मोठया प्रमाणावर होत असून या कालावधीमध्ये निरनिराळया कारणामुळे उदा. मुळातच आवंटन कमी असणे, पाऊस किंवा अतिवृष्टिमुळे, रेल्वे वाहतूकीमध्ये अडथळा येणे, रेल्वे रेक वेळेवर उपलब्ध न होणे, सामाजिक आंदोलन इत्यादीमुळे खताच्या वाहतूकीवर विपरीत परिणाम होतो. राज्यात जवळजवळ ८० टक्के क्षेत्र हे कोरडवाहू असून यातील जास्तीतजास्त क्षेत्र हे मराठवाडा व विदर्भातील आहे. या भागात प्रामुख्याने कापूस व सोयाबीन यासारखी नगदी पिके घेतली जातात.तसेच या भागात पाऊस पडताच पेरणीच्या वेळेस शेतकऱ्यांकडून एकाचवेळी खतासाठी मागणी होते. त्यामुळे वेळेवर खत पुरवठा होण्यास अडचण येते. यास्तव खरीप हंगाम २००९ मध्ये सुध्दा सुमारे ४.०० लाख मे.टन फॅस्फेटिक खताचा संरक्षित साठा करण्यात आला होता.

**२.** राज्यात खरीप हंगाम २०१० साठी डीएपी खताची अंदाजित ९.०० ते १०.०० लाख मे टन आवश्यकता असून उत्पादकामार्फत पुरवठा होवून सुध्दा सुमारे ५० टक्के म्हणजेच ५.०० लाख मे.टन खताची तफावत राहील, तसेच संयुक्त खतांची मागणी १० लाख मे टन असून उत्पादकांकडून उपलब्धता ५ ते ५.५० लाख मे. टनाच्या पुढे जात नाही. त्यामुळे मागणी व पुरवठा यामध्ये ५.५० ते ६ लाख मे टनांची तफावत राहील असा अंदाज आहे. संयुक्त खतांचे उत्पादन देशांतर्गतच होत असल्याने त्यांच्या उपलब्धतेबाबत मर्यादा आहेत.

३. वरील परिस्थिती लक्षात घेता खरीप हंगाम २०१० साठी कमीतकमी ६.०० लाख मे.टन फॅास्फेटिक खताचा राज्यातील निरनिराळया भागामध्ये संरक्षित साठा (बफर स्टॅाक) करुन ठेवणे आवश्यक आहे. हा साठा शक्यतो फेब्रुवारी ते मे या कालावधीमध्ये करून ठेवणे योग्य राहील. कारण या कालावधीमध्ये शेतकऱ्याकडे खताचा वापर कमी असतो व उत्पादकामार्फत खताचा उत्पादनानुसार पुरवठा निश्चित असतो त्यामुळे या कालावधीमध्ये खत साठा करून ठेवण्याचा प्रस्ताव मंत्रीमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

**शासन निर्णयः**

दि.१२ जानेवारी,२०१० रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत खरीप हंगाम २०१० साठी स्फुरदयुक्त / पालाशयुक्त व संयुक्त खताचा संरक्षित साठा (बफर्स स्टॅाक ) करण्यास मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. तसेच यासंदर्भात मंत्रीमंडळाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

१) खरीप हंगाम २०१०-११ करीता राज्यामध्ये ५.०० लाख मे.टन डिएपी, एमओपी व संयुक्त खते तर १.०० लाख मे.टन पोटॅश खताची आयात करुन सरंक्षित साठा करण्यात यावा.

२) यासाठी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ व महाराष्ट्र स्टेट को.ऑप. मार्केटिंग फेडरेशन या दोन्ही संस्थांची शासनाचे नोडल एजन्सी म्हणुण नियुक्ती करण्यांत यावी. महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने ३.५० लाख मे. टन

स्फुरदयुक्त/पालाशयुक्त व संयुक्त खते उदा. डिएपी, एमओपी, संयुक्त खते आणि महाराष्ट्र राज्य मार्केटिंग फेडरेशने २.५० लाख मे. टन स्फुरदयुक्त/पालाशयुक्त व संयुक्त खते आयात करुन खताचा संरक्षित साठा करावा.

३) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाला रु.३२५ कोटी आणि महाराष्ट्र स्टेट को.ऑप.मार्केटिंग फेडरेशनला रु.२२५ कोटी इतके कर्ज घेण्यास शासन हमी देण्यात यावी. या शासनहमीची मुदत दि.३१/१२/२०१० पर्यंत ठेवावी.

४) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ आणि महाराष्ट्र स्टेट को.ऑप. मार्केटिंग फेडरेशन या दोन्ही संस्थाना खत साठवूणक करण्याकरीता येणा-या खर्चाची माहिती खालीलप्रमाणे आहे.

| अ. क्र | बाब | दर रू. प्रति मे.टन | एकूण (रुपये कोटीत) |
|---|---|---|---|
| १ | रेकपॉईंट ते गोदामपर्यंत खत वाहतूकीसाठी येणारा (प्राथमिक वाहतूक) खर्च | २५०.०० | १५.०० |
| २ | गोदाम ते डिलरपर्यंत दुय्यम वाहतूकीचा खर्च | १५०.०० | ९.०० |
| ३ | गोदामामध्ये खत उतरविण्याचा हमाली खर्च | २५.०० | १.५० |
| ४ | गोदामामध्ये खत चढविण्यासाठीचा हमाली खर्च | २५.०० | १.५० |
| ५ | गोदाम भाडे सरासरी ५ महीन्याकरीता | ३०.०० | ९.०० |
| ६ | विमा | विमा कंपनीच्या दराप्रमाणे | १.५० |
| ७ | कर्जावरील व्याज १० टक्के ९ महिन्याकरीता | -- | २७.५० |
| ८ | हमी शुल्क | २ टक्के प्रमाणे | ११.०० |
| | एकूण खर्च | ..... | ७६.०० |

अश्याप्रकारे या दोन्ही संस्थांना एकूण रु. **७६.००** कोटी इतक्या खर्चाची प्रतिपुर्ती शासनामार्फत करण्यासाठी सन २०१०-११ मध्ये अर्थसंकल्पीय तरतुद करण्यात यावी.

५) खरीप २०१० साठी खताची आयात केंद्रशासनाने ठरवून दिलेल्या कंपनीमार्फत करण्यांत यावी.

उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ व महाराष्ट्र स्टेट को.ऑप. मार्केटिंग फेडरेशन या दोन्ही संस्थांनी केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या अधिकृत खत कंपनीकडून खत उपलब्ध करून राज्यातील विविध भागात संरक्षीत साठा (बफर्स स्टॉक) करण्याची कार्यवाही करावी. तसेच यासाठी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळास येणा-या खर्चाची अर्थसंकल्पीय तरतूद कृषि विभागामार्फत व महाराष्ट्र स्टेट को.ऑप. मार्केटिंग फेडरेशनला येणा-या खर्चाची अर्थसंकल्पीय तरतूद सहकार व पणन विभागामार्फत करण्यात यावी. या दोन्ही संस्थांकरीता आवश्यक ती पुढील कार्यवाही वरीलप्रमाणे संबंधीत विभागामार्फत करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००२०२१६१११३२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वा. म. तुरूकमाने)
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे-४११००५

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ, प्रभादेवी, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र स्टेट को.ऑप. मार्केटिंग फेडरेशन, कनमुर हाउस, मस्जीद, मुंबई
संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि आयुक्तालय, पुणे.
उपसचिव (सहकार व पणन विभाग), मंत्रालय,मुंबई.
वित्त विभाग (साउ/शासन हमी/व्यय) मंत्रालय,मुंबई.
मा. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक,
मा. प्रधान सचिव (सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग) यांचे स्वीय सहायक,
निवड नस्ती.